





जनहिताय सर्वदा

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक: गौखनि-३७/०९१७/प्र.क्र.४३७/ख** दिनांक:- १३ मार्च,२०२४

**विषय:- गौण खनिज- सोलापूर**
**सन २०१५-१६ वर्षाकरीता मौजे खानापूर अंकलगे, ता. अक्कलकोट, जि. सोलापूर या वाळूगटातून शिल्लक वाळूच्या प्रमाणशीर रक्कमेचा परतवा मिळणेबाबत.**
**श्री. दत्त एंटरप्रायजेस तर्फे आप्पाशा उमदी**

**शासन ज्ञापन :-**

सन २०१५-१६ वर्षाकरीता मौजे खानापूर अंकलगे, ता. अक्कलकोट, जि. सोलापूर हा वाळू घाट लिलावधारक श्री.दत्त एंटरप्रायजेस तर्फे श्री.अप्पाशा गुरुसिध्दप्पा ऊमदी, रा.हत्तुरे यांना ८९,२६९ ब्रास परिमाणाकरीता रक्कम रुपये १२,७६,००,०००/- इतक्या सर्वोच्च बोलीस अपर जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी दिनांक ०२.०२.२०१६ च्या आदेशान्वये दिनांक ३०.०९.२०१६ पर्यंतच्या कालावधीकरीता मंजूर केला होता.

०२. मौजे अंकलगे, ता. अक्कलकोट या वाळूगटातून मंजूर वाळूसाठ्याचे उत्खनन न करता आलेल्या वाळूच्या परिमाणाची रक्कम परत करणेबाबतची लिलावधारक यांची विनंती शासनाच्या दिनांक १०.०१.२०२० च्या पत्राने अमान्य केली होती. सदर पत्राने व्यथित होऊन लिलावधारक यांनी मा. मंत्री (महसूल) यांचेकडे अपील दाखल केले होते. मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक २०.०७.२०२१ च्या आदेशान्वये शासनाने निर्गमित केलेले दि.१०.०१.२०२० रोजीचे पत्र रद्द करुन जिल्हास्तरीय समितीकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर विभागाने निर्णय घेण्याबाबत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत.

०३. मा. मंत्री (महसूल) यांचे दिनांक २०.०७.२०२१ रोजीचे आदेश त्यानुषंगाने जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी अनुक्रमे दिनांक १५.०२.२०२३ व दिनांक २०.०६.२०२३ रोजी सादर केलेला अहवाल विचारात घेता, मौजे खानापूर-अंकलगे, ता. अक्कलकोट, जि. सोलापूर या वाळू घाटामधून नैसर्गिक कारणास्तव मंजूर वाळूसाठ्यापैकी उत्खनन न करता आलेल्या वाळूच्या प्रमाणशीर परताव्याची रक्कम रु.२,८९,९१,५५२/- (रुपये दोन कोटी एकोणव्वद लाख एक्यानव हजार पाचशे बावन्न फक्त) लिलावधारक यांना अदा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०४. सबब, लिलावधारक श्री.दत्त एंटरप्रायजेस तर्फे श्री.अप्पाशा गुरुसिध्दप्पा ऊमदी, रा.हत्तुरे यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन करता न आलेल्या वाळूची प्रमाणशिर रक्कम रु.२,८९,९१,५५२/- (रुपये दोन कोटी एकोणनव्वद लाख एक्यानव हजार पाचशे बावन्न फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

०५. या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२- खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०/२०२४/व्यय-९ दि.१७.१.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१५४९२०४२१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.13 15:58:56 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, सोलापूर**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी,सोलापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१),
७) निवडनस्ती